अमरावती वनवृत्तातील मोर्शी वनपरिक्षेत्रातील निसर्ग पर्यटन केंद्रासभोवताल Construction of Compound Wall with Fixing Chainlink Fencing बांधकामाच्या कामास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. निसप्र-२०१७/प्र.क्र.८०/फ-५**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक - १४ ऑगस्ट, २०१७

<u>वाचा</u> - १. अप्पर प्रधान मुख्य वन संरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास),महाराष्ट्र राज्य,नागपुर यांचे पत्र क्र. कक्ष -२४(३)/प्र.क्र.४४/१२३/२०१७-१८, दि. १९/५/२०१७

<u>प्रस्तावना</u> -

अपर प्रधान मुख्य वन संरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य नागपुर यांनी दि. १९/५/२०१७ च्या पत्रान्वये अमरावती वनवृत्तातील मोर्शी वनपरिक्षेत्रातील निसर्ग पर्यटन केंद्रासभोवताल Construction of Compound Wall with Fixing Chainlink Fencing या बांधकामाच्या रु.६७.५४ लक्ष इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबतचा प्रस्ताव शिफारशीसह शासनास सादर केला होता. या कामास वन अभियंता, महाराष्ट्र राज्य नागपूर यांनी दि. २३.३.२०१७ रोजी तांत्रिक मंजूरी दिलेली आहे.

सदरहू बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अमरावती वनवृत्तातील मोर्शी वनपरिक्षेत्रातील निसर्ग पर्यटन केंद्रासभोवताल Construction of Compound Wall with Fixing Chainlink Fencing या बांधकामास सार्वजनिक बांधकाम विभागाने दिलेल्या मंजूरीनुसार खालील विवरणपत्रात नमुद केल्याप्रमाणे एकुण रु.६७.५४ लक्ष **(सदुसष्ठ लाख चोपन्न हजार फक्त)** इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

(रक्कम लाखात)

| अ.क्र | कामाचा तपशिल | शासनमान्य अंदाजपत्रकीय रक्कम |
|---|---|---|
| १ | Construction of Compound Wall with Fixing Chainlink Fencing at Morshi Eco Tourism center in Morshi range in Amravati Division | रु. ६७.५४ |
| | **एकूण** | **रु. ६७.५४** |

सदरहू प्रशासकीय मान्यता (वित्तीय मान्यता वगळून) पुढील अटींच्या अधीन राहून प्रदान करण्यात येत आहे.

१) कामासाठी वनसंवर्धन अधिनियम १९८० अंतर्गत आवश्यक असलेली परवानगी घ्यावी.
२) काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करून घ्यावी.
३) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक व दरपत्रके मंजूर करुनच काम हाती घ्यावे.
४) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/प्र.क्र. १७७/तां.क.१ दि १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

हे आदेश शासन निर्णय वित्त विभाग, क्र. विअप्र १०.०८/प्र.क्र. ७०/२००८/ विनियम, दि. १५ मे २००९ , वित्तीय अधिनियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग- पाच नुसार महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका अंतर्गत प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार, अ.क्र.१, परिच्छेद क्र. १३४ नुसार विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार व सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २/इमा-३ दि. १/८/२०१७ ला अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०८१४१७१४२५५६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sujay Dodal

Digitally signed by Sujay Dodal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=353112ee0fa47f9ff9bedae88f651d09fdb142df5fbce9c004f7eea06d8b9baf, cn=Sujay Dodal
Date: 2017.08.14 17:04:04 +05'30'

**( सुजय दोडल )**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वन संरक्षक (वन बल प्रमुख) महाराष्ट्र राज्य,नागपुर
२. अपर प्रधान मुख्य वन संरक्षक ( अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य,नागपुर
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र निसर्ग पर्यटन मंडळ, नागपूर.
४. मुख्य वन संरक्षक (प्रादेशिक) अमरावती.
५. उप वनसंरक्षक, (प्रा) अमरावती.
६. महालेखापाल,१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परिक्षण) मुंबई / नागपुर
७. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारत-३), मंत्रालय, मुंबई-३२.
८. कक्ष अधिकारी (व्यय-१०)(विनियम) वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
९. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय,मुंबई-३२.
१०. ब-१/फ-१/फ-२ कार्यासन ,महसुल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
११. कार्यासन फ-५, महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२ (निवड नस्ती).